**निवडश्रेणी लघुलेखक संवर्गाला मंजूर करण्यात आलेली वेतनश्रेणी विक्रीकर विभागातील स्वीय सहायक(गट ब) पदास लागू करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांक विकवि १०२४/प्र.क्र.२५/विप्र ४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २५ जून, २०२४.

**वाचा :** १. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एसआरव्ही-१०८९/ प्र.क्र.१५/८९/बारा, दिनांक १६.१०.१९९०

२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एसआरव्ही-१०९५/ प्र.क्र.४/९५/बारा, दिनांक १८.१२.१९९५

३. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक विकआ-१२०६/प्र.क्र.१५३/२००६/ विक्रीकर प्रशासन-४, दिनांक २६.१२.२००६

४. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक वेपुर ११२१/प्र.क्र.४/सेवा-९, दिनांक १३.०२.२०२३

**प्रस्तावना :**

मंत्रालयाबाहेरील शासकीय कार्यालयांमध्ये किंवा विभागात एका नियुक्ती प्राधिकाऱ्याच्या कक्षेत उच्चश्रेणी लघुलेखकांची ४ किंवा त्यापेक्षा अधिक पदे असतील तर अशा प्रत्येक ४ पदांपैकी एक पदोन्नतीचे पद रु.२३७५-३५०० (चौथ्या वेतन आयोगातील वेतनश्रेणी) या वेतनश्रेणीमध्ये मंजूर करण्यात यावे, त्या पदाचे स्वीय सहायक असे पदनाम करण्यात यावे व त्या पदास राजपत्रित वर्ग-२ दर्जा देण्यात यावा, असे आदेश संदर्भीय क्र.१ येथील शासन निर्णयान्वये दिले होते. सदर आदेशांच्या अंमलबजावणीच्या संदर्भात संदर्भीय क्र.२ येथील शासन निर्णयान्वये सूचना देण्यात आल्या होत्या. त्यानुसार वित्त विभागाच्या दिनांक २६.१२.२००६ रोजीच्या शासन निर्णयान्वये विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य मुंबई यांच्या आस्थापनेवरील उच्चश्रेणी लघुलेखकांच्या मंजूर पदांपैकी ४ पदे स्वीय सहायक या पदामध्ये श्रेणीवाढ करुन त्यांना राजपत्रित वर्ग-२ चा दर्जा देण्यात आला आहे. राज्य वेतन सुधारणा समिती, २०१७ च्या अहवाल खंड-२ मधील शिफारशी शासनाने मान्य करुन वित्त विभाग दिनांक १३.०२.२०२३ च्या शासन निर्णयानुसार लघुलेखक (निवडश्रेणी) संवर्गाचा वेतनस्तर एस १७: ४७६०० - १५११०० असा सुधारित करण्यात आला आहे. सदर सुधारित वेतनश्रेणी विक्रीकर विभागातील स्वीय सहायक (गट ब) या पदास मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राज्य वेतन सुधारणा समिती,२०१७ च्या अहवाल खंड-२ मधील शिफारशीनुसार, वित्त विभागाच्या दिनांक १३.०२.२०२३ च्या शासन निर्णयान्वये निवडश्रेणी लघुलेखक संवर्गाची सुधारित करण्यात आलेली एस १७: ४७६०० - १५११०० ही वेतनश्रेणी विक्रीकर विभागातील स्वीय सहायक (गट ब) या संवर्गास मंजूर करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.८१/सेवा-९, दिनांक ६.२.२०२४ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०६२५१६१२३५९९०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

BHAGYASHREE JAIDEEPSINGH DEORE

Digitally signed by BHAGYASHREE JAIDEEPSINGH DEORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT,
2.5.4.20=92dc5d3b7ef298d479386f07d9afafc579f93cebe1ae64abae40ebb4defc9
ec2, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=E3F70D0BD9657217AB90182E655B603B823180978E71DFD3DE16
A805076EDCE0, cn=BHAGYASHREE JAIDEEPSINGH DEORE
Date: 2024.06.25 16:24:15 +05'30'

**( भाग्यश्री देवरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) राज्यकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य,वस्तू व सेवाकर,माझगांव, मुंबई
२) विशेष राज्यकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, वस्तू व सेवाकर,माझगांव, मुंबई.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, मुंबई.
५) महालेखापाल (लेखापरीक्षा)-१ महाराष्ट्र, मुंबई
६) महालेखापाल (लेखा परिक्षा) -२, महाराष्ट्र, नागपूर
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
९) सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी,
१०) मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
११) मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१२) मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१३) मा. राज्यमंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१४) मुख्य सचिव, यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
१५) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (वित्त) यांचे स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई
१६) अपर मुख्य सचिव (व्यय) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१७) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१८) सह सचिव, सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन १०
१९) कार्यासन विक्रीकर प्रशा-१/प्रशा-२ व प्रशा-३, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०) निवड नस्ती, विक्रीकर प्रशा-४